**केंद्र पुरस्कृत योजना सन २०२०-२०२१**
**“वन्यजीव आश्रयस्थानांचा एकात्मिक विकास” अंतर्गत माळढोक पक्षी संरक्षण व संवर्धन करीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०९.२०/प्र. क्र. १६२/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ ऑक्टोंबर, २०२०.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ मे, २०२०.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकिर्ण१०१८/प्र.क्र. ४६/अर्थोपाय, दिनांक १८.०५.२०२०.
५. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दि. २६ मे, २०२०.
६. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. ३४-१/२०१४ डब्ल्यू.एल., दिनांक ०७.०९.२०२०.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्र. कक्ष- १ / सी / यो /प्र. क्र. ०८/३१/२०२०-२०२१, दिनांक : २१.०९.२०२०.

प्रस्तावना :-

सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना “वन्यजीव आश्रयस्थानांचा एकात्मिक विकास” अंतर्गत माळढोक पक्षी संरक्षण व संवर्धन करीता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये सर्वसाधारण घटक अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता रु. १२६.३८ लक्षचे कार्यबाबीस मंजूरी प्रदान केली आहे. त्या अनुषंगाने केंद्र शासनाचा **(सर्वसाधारण घटक)** अनावर्ती + आवर्ती बाबींचा हिस्सा (६०%) प्रथम हप्ता म्हणून रु. ३७.९१४ लक्ष तर त्या अनुरुप राज्य शासनाचा **(सर्वसाधारण घटक)** अनावर्ती + आवर्ती बाबींचा हिस्सा (४०%) प्रथम हप्ता म्हणून रु. २५.२७६ लक्ष असे एकूण रु. ६३.१९ लक्ष निधी वितरीत करण्यास मंजूरी प्रदान केली आहे.

शासन निर्णय :-

सदर शासन निर्णयान्वये **रु. ६३.१९ लक्ष** निधी संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) “वन्यजीव आश्रयस्थानांचा एकात्मिक विकास” या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत माळढोक पक्षी संरक्षण व संवर्धन कामांसाठी होणारा खर्च **I)** अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींकरीता रु. ३७.९१४ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११०, वन्यजीवन संरक्षण, (००) (०३) वन्यजीव आश्रयस्थानांचा एकात्मिक विकास (सर्वसाधारण) (६०% केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ ०७८४) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा हिस्सा रु. २५.२७६ लक्ष लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११०, वन्यजीवन

संरक्षण, (००) (१६) वन्यजीव आश्रयस्थानांचा एकात्मिक विकास (सर्वसाधारण) (४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२४०६ २३८४) सन २०२०-२०२१ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची जबाबदारी संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

उ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक : १६.०४.२०२०, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक : ०४.०५.२०२०, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. १४ मे, २०२०, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकिर्ण१०१८/प्र.क्र. ४६/अर्थोपाय, दिनांक १८.०५.२०२० व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दिनांक : २६.०५.२०२० चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १८५/१४७५, दिनांक ०७.१०.२०२० व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६५/व्यय-१०, दिनांक १२.१०.२०२० ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२३१७०८१८६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.10.23 16:27:25 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. उप वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).